सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्र. ईगव्ह -०४२४/प्र.क्र.११४/१४-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय मुंबई-४०० ०३२

दिनांक - १२ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-** १) सामान्य प्रशासन विभाग यांचा शासन निर्णय क्र.GADIT०८०/४/२०१४-O/O DIRECTORATE of IT-DIT(MH) दि.०५ ऑक्टोबर,२०२३

२) महाआयटी कडून प्राप्त Invoice Proforma, दि. १४ /०३/ २०२४ .

३) प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त दि. २६/०४/२०२४.

४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र./कृआ/संप्र/ई-गव्हर्नन्स/३४५१-२७८२/१९९०६/२०२४ , दि. ०६/०८/२०२४

**प्रस्तावना :-**

कृषि व पदुम विभागाचे (खुद्द), मंत्रालय तसेच कृषि आयुक्तालय व अखत्यारितील कार्यालयांचे संगणकीयदृष्ट्या बळकटीकरण व्हावे यासाठी राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजना राबविण्यात येते. कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग (खुद्द) व कृषि आयुक्तालयामार्फत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत विविध उपक्रम राबविण्यात येतात, तसेच विविध उपक्रमांचे नियोजन करण्यात येते. सदर योजनेंतर्गत राज्य शासनातर्फे दरवर्षी ठराविक रक्कम मंजूर करण्यात येते व सदर मंजूर झालेली रक्कम कृषि विभाग (खुद्द) तसेच कृषि आयुक्तालय, पुणे यांना आवश्यकतेनुसार विभागून वितरीत करण्यात येते.

ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजनांतर्गत योजना आहे. सन २०२४-२५ या वित्तीय वर्षामध्ये सदर योजनेसाठी (३४५१ २७८२) एकूण रुपये २५ कोटी निधी अर्थसंकल्पित केलेला आहे. तथापि, संदर्भ क्र. २, ३ व ४ च्या अनुषंगाने सन २०२४-२५ करीता राज्य ई-गव्हर्नन्स योजना राबविण्याकरीता रु. २२ कोटी ५५ लक्ष निधी आवश्यक आहे. सदर रु. २२ कोटी ५५ लक्ष निधीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:

**शासन निर्णय :-**

१. कृषि व पदुम विभाग, मंत्रालयीन कार्यालयांचे व कृषि आयुक्तालय, पुणे व अधिनस्त विविध कार्यालयांचे संगणकीयदृष्टया बळकटीकरण करण्यासाठी "राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम" ही राज्य योजना राबविण्यात येत असून सन २०२४-२५ या वित्तीय वर्षामध्ये रु. २२ कोटी ५५ लक्ष रकमेच्या मर्यादेत पुढीलप्रमाणे ई-गव्हर्नन्स कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत :

( रक्कम रुपये लक्षामध्ये )

| अ. क्र. | खर्चाची बाब | निधी मागणी - सन २०२४-२५ |
|---|---|---|
| **अ) कृषि आयुक्तालय स्तर** | | |
| **I) महाआयटी मुंबई यांना अदा करावयाच्या बाबी** | | |
| १ | कृषी विभाग अंतर्गत आयटी अप्लिकेशन विकसन/व्यवस्थापन/देखभाल व social Media - तांत्रिक मनुष्यबळ करीता महाआयटी मुंबई यांना आगाऊ सेवाशुल्क अदा करणे (३१ जानेवारी २०२५ पर्यंत) | १५२.२५ |
| २ | हार्डवेअर देखभाल व दुरुस्ती करिता FMS टीम करिता आगाऊ सेवाशुल्क महाआयटी मुंबई यांना अदा करणे (३१ मार्च २०२५ पर्यंत) | ४१.५५ |
| ३ | ॲग्रीस्टाक प्रकल्पांकरीता तांत्रिक मनुष्यबळ पुरवठा (२८ फेब्रुवारी २०२५ पर्यंत) | ७६.२५ |
| ४ | नमो शेतकरी महासन्मान निधी या योजनेंतर्गत निधी वाटपाकरीता पोर्टल विकसित करणे | ७३.८४ |
| **एकुण** | | **३४३.८९** |
| **II) कृषी आयुक्तालय स्तरावर** | | |
| ५ | क्षेत्रीय स्तरावरील व कृषि आयुक्तालयातील कार्यालयासाठी हार्डवेअर खरेदी- संगणक, प्रिंटर, लॅपटॉप, स्कॅनर | ४९१.३१ |
| ६ | कृषि आयुक्तालय स्तरावरील कार्यालयांकरीता दैनंदिन कामकाजामध्ये पुरविण्यात येणाऱ्या सेवा (टोनर रिफीलींग, प्रिंटर दुरुस्ती, बायोमेर्टिक इ.) ची देयके अदा करणे तसेच दुरुस्ती/देखभालीकरीता आवश्यकतेनुसार लागणाऱ्या साहित्यांची खरेदी - हार्डवेअर खरेदी/दुरुस्ती/देखभाल (UPS, बॅटरी, इन्व्हर्टर,Network Cable, Network Switch, नेटवर्क करीता लागणारे साहित्य, Printer Cartage, Printers Part, Pen drive, Hard disk, RAM, Biometric Machines, Antivirus इ. ) | २८.६९ |
| ७ | कनेक्टिव्हिटी - आयुक्तालय स्तरावरील नेटवर्किंग, कनेक्टिव्हिटी आगाऊ देयके, ब्रॉड बॅण्ड सेवा देणेसाठी Wi-Fi Router बाबत देयके, firewall खरेदी, समांतर लीज्ड लाईन सुविधा, ms team परवाने खरेदी/नुतनीकरण व तद्अनुषंगिक साहित्य खरेदी | १५.०० |
| ८ | कृषी विभागाच्या आज्ञावली करिता Cloud व्यवस्थापन, security audit, SSL प्रमाणपत्रे ई संदर्भात सेवाशुल्क अदा करणे. | २५.०० |
| ९ | आय टी सल्लागार तांत्रिक मनुष्यबळ सेवा (३१ मार्च २०२५ पर्यंत) | २३०.१० |
| **एकुण** | | **७९०.१०** |
| **III) महाॲग्रीटेक प्रकल्प अंतर्गत सेवाशुल्क (०६/०६/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये)** | | **८७६.७२** |
| **एकूण "अ" (I+II+III)** | | **२०१०.७१** |
| **आ) मंत्रालय स्तर** | | |
| १ | कृषि विभागासाठी नियुक्त तांत्रिक सल्लागारांचे सेवाशुल्क | १७५.२० |
| २ | कृषि विभागाच्या साऊ सेवार्थ प्रणालीच्या देखभालीसाठी आवश्यक मनुष्यबळाचे सेवाशुल्क | ६९.१४ |
| **एकूण "आ"** | | **२४४.३४** |
| | **एकूण (अ+आ)** | **२२५५.०५** |

२. या शासन निर्णयान्वये कृषि विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाकरिता वितरीत करण्यात येणारा निधी पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ करिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतुन खर्ची टाकावा :-

**"मागणी क्र.डी-७**
**३४५१ सचिवालय- आर्थिक सेवा,**
**पंचवार्षिक योजनांतर्गत योजना**
**(०२) योजना**
**(०२) (०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम अंमलबजावणी**
**(कृषि) (३४५१ २७८२),१७ संगणक खर्च**

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१२१२१६०६८००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.08.12 12:31:36 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सह सचिव (आस्थापना), कृषि व पदुम विभाग (खुद्द) मंत्रालय, मुंबई-३२

**प्रत-**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
२) मा.मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) महालेखापाल१/२ (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
९) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई/अधिदान व लेखा कार्यालय मुंबई
११) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन ५ वा मजला, मुंबई
१२) निवडनस्ती (१४-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२